सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य हज समितीस निधी वितरित करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः हज-२०२३/प्र.क्र.१२३/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:- ३१ मे, २०२३.

**संदर्भ**:- १. वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.२०२४.२०२३.
२. महाराष्ट्र राज्य हज समितीचे क्र.बीयुडी-२०२३/ प्र.क्र.२/एस एच सी/ बी-१३४, दिनांक १०.०५.२०२३ चे पत्र.

**प्रस्तावना**:-

महाराष्ट्र राज्य हज समितीच्या कार्यालयासाठी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात "मागणी क्र. झेड ई-१, ए, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च २२३५ ए २६७, योजनेतर दत्तमत, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टासाठी रु. १,७४,७३,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीपैकी वित्त विभागाने १० % म्हणजेच रु. १७,४७,३००/- इतका निधी वितरणासाठी विभागास उपलब्ध करुन दिलेला आहे. महाराष्ट्र राज्य हज समितीने कार्यालयीन खर्चासाठी संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार उपलब्ध निधीच्या मर्यादेत महाराष्ट्र राज्य हज समितीस कार्यालयीन खर्चासाठी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय**:-

संदर्भ क्र. २ च्या पत्रान्वये मागणी केल्यानुसार उपलब्ध निधीच्या मर्यादेत महाराष्ट्र राज्य हज समिती मुंबई या कार्यालयास खाली नमूद बाबींसाठी रु.१६,८९,००० /- (रुपये सोळा लक्ष एकोणनव्वद हजार फक्त) इतका निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | कोणत्या प्रयोजनासाठी रक्कम हवी आहे. | वितरीत तरतूद |
|---|---|---|
| १ | महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालयाचे भाडे-एप्रिल २०२३ ते मे २०२३. (रु. १,३२,०००/- प्रति महिना X २ महिने) | रु. २,६४,०००/- |
| २ | महाराष्ट्र राज्य हज समिती कार्यालय विज देयक- एप्रिल २०२३ ते जून २०२३. (रु.२५,०००/- प्रति महिना X ३ महिने) | रु. ७५,०००/- |
| ३ | महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई कार्यालयीन खर्च एप्रिल २०२३ ते जून २०२३. (रु.२५,०००/- प्रति महिना X ३ महिने) | रु. ७५,०००/- |
| ४ | नागपूर हज हाऊसच्या देखभाल व सुरक्षासाठी खर्च एप्रिल २०२३ (रु. २,१०,०००/-१ महिना ) | रु. २,१०,०००/- |
| ५ | नागपूर हज हाऊस इलेक्ट्रीक बिल - एप्रिल २०२३ ते जून २०२३. (रु.३५,०००/- प्रति महिना X ३ महिने) | रु.१,०५,०००/- |

| | | |
|---|---|---|
| ६ | नागपूर हज हाऊस पाणी देयक - एप्रिल २०२३ ते जून २०२३.<br>(रु. २०,०००/- प्रति महिना X३ महिने) | रु. ६०,०००/- |
| ७ | नागपूर हज हाऊस इमारतीमधील उद्वाहने दुरुस्ती व विद्युत व इतर कामे करण्यासाठीचा खर्च | रु. ९,००,०००/- |
| | **एकूण** | **रु. १६,८९,०००/-** |

२. महाराष्ट्र राज्य हज समितीच्या सक्षम प्राधिकाऱ्याने मंजूर करण्यात आलेल्या तरतूदीच्या मर्यादेत खर्च करण्याची आवश्यक ती दक्षता घ्यावी. केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र विहीत मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करण्याची आणि महालेखापालांच्या लेख्याशी खर्चाचा ताळमेळ घालण्याची जबाबदारी कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांची राहील.

३. सदर निधी यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करावयाच्या अटीच्या अधीन राहून कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. याकरिता ते "नियंत्रक अधिकारी" आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून काम पाहतील.

४. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र. झेड ई-१, ए, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०२) समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) (१८) यात्रेकरुंचा खर्च २२३५ ए २६७, योजनेतर दत्तमत, ३१- सहायक अनुदान (वेतनेतर)" या उद्दिष्टाखाली सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः- अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२.०४.२०२३ अंतर्गत प्रशासकीय विभागांना प्राप्त झालेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०६०११३२३१२३७१४ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PARVEEN JAVED JUGARI

Digitally signed by PARVEEN JAVED JUGARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7756c9321eaddbc49e6838c15545ed29cc20adf253d62a3e9c3655f35e48b136, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=33DA49010D9298976BDFC5AFC6237D485983227E0643169266E6A377187E832D, cn=PARVEEN JAVED JUGARI
Date: 2023.06.01 13:23:23 +05'30'

**( परवीन जुगारी )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई / नागपूर, महाराष्ट्र राज्य.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
३. अवर सचिव (व्यय-१/अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अवर सचिव (का-५/का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य हज समिती, रुम.क्र.६ व ७, तळमजला, साबू सिद्दिकी,मुसाफिरखाना, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.
६. निवडनस्ती (का-५).